महाराष्ट्र राज्याच्या विकासाच्या दृष्टीने अभियांत्रिकी शिक्षण आणि संशोधन यामध्ये सुधारणा करण्यासंदर्भात कार्य गटाची स्थापना करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बैठक - ३६११/(५६/१५)/तांशि - २**

हुतात्मा राजगूरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

तारीख: २८ एप्रिल, २०१५

**प्रस्तावना -**

राज्यातील विविध सामाजिक स्वरुपाच्या प्रश्नांची संशोधनाव्दारे उकल करुन त्यावर अचूक उपाययोजना शोधण्याच्या दृष्टीने विविध शासकीय यंत्रणा व शैक्षणिक संस्था यांच्या दरम्यान महत्त्वाच्या गंभीर समस्यांसंदर्भातील संशोधन वृध्दिंगत करण्याकरिता आणि प्रकल्प निहाय निरनिराळया योजनांमध्ये अभियांत्रिकी तसेच अन्य व्यावसायिक अभ्यासक्रमांमध्ये शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा सहभाग घेऊन त्या अनुषंगाने विविध विभागांतर्गत उपक्रमांमध्ये ठोस उपाययोजना सुचविण्याकरिता मा. मुख्यमंत्री महोदयांकरिता दि. २३.०३.२०१५ रोजी बैठक पार पडली. सदरहू बैठकीत श्री. मिलिंद सोहणी, चेअर प्राध्यापक, सी.टी.अे.आर.ए. ॲन्ड सी.एस.ई., आय.आय.टी., पवई, मुंबई यांनी सादरीकरण केले. सदर सादरीकरणाच्या अनुषंगाने राज्यातील विविध सामाजिक स्वरुपाच्या प्रश्नांची संशोधनाव्दारे उकल करुन त्यावर अचूक उपाययोजना शोधण्याच्या दृष्टीने एक कार्य गट स्थापन करण्याचे निश्चित करण्यात आले आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे कार्य गट गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कार्य गटाच्या सदस्याचे नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| १ | डॉ. महाजन, संचालक , तंत्र शिक्षण संचालनालय, मुंबई | अध्यक्ष |
| २ | श्री. मिलींद सोहोनी, चेअर प्राध्यापक, सी.टी.ए.आर.ए. ॲण्ड सी.एस.ई., आय.आय. टी., पवई, मुंबई. | सदस्य |
| ३ | श्रीमती मृदूल सामरे, वरीष्ठ लेखाधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ | सदस्य |
| ४ | श्री. जे. डी. भुतांगे, संचालक, व्यवसाय शिक्षण | सदस्य |
| ५ | डॉ. आर.आर. आसावा, प्रभारी संचालक (प्रशिक्षण) | सदस्य |
| ६ | श्री. ढोके, उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ | सदस्य |
| ७ | श्री. एस.ई.ए.हाशमी, क्षमता विकास जल स्वराज्य २, तज्ञ | सदस्य |

| अ.क्र. | कार्य गटाच्या सदस्याचे नाव व पदनाम | पद |
|---|---|---|
| ८ | श्री. श्रीनिवास कातकडे, कार्यकारी अभियंता, सा.बां.वि.,उस्मानाबाद | सदस्य |
| ९ | श्री. दिलीप राजूरकर, मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव | सदस्य |
| १० | श्रीमती प्रिया खान, मा. मुख्यमंत्री यांचे विशेष कार्य अधिकारी | सदस्य |
| ११ | डॉ. किरण पाटील, उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२ | सदस्य सचिव |

## कार्यगटाची कार्यकक्षा

१. आय.आय.टी. मुंबईच्या ग्रामीण क्षेत्र प्रौद्योगिक विकास प्रकल्प (Center for Technology Alternatives for Rural Areas) यांनी शासनास सादरीकरणाद्वारे सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने विविध निश्चित स्वरुपाच्या ठोस योजना / निश्चित योजना आखण्यासाठी शासनास शिफारस करणे.

२. राज्यातील अभियांत्रिकी तसेच अन्य व्यवसायिक अभ्यासक्रम चालविणाऱ्या महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांकरीता इंटर्नशीप योजना कार्यान्वित करणे.

३. सदर प्रयोजनार्थ शैक्षणिक संस्था निवडण्याचे निकष, पात्रता व प्रक्रिया निश्चित करणे.

४. प्रस्तावित उपक्रमाकरीता आवश्यक असणारा निधी व त्यांचे स्त्रोत यांची निश्चिती करणे.

५. प्रस्तुत प्रकरणी सदर प्रकल्पातंर्गत विविध शासकीय संस्था व क्षेत्रीय कार्यालय यांच्या दरम्यानच्या सामंजस्याकरीता शासकीय आदेशाचे प्रारुप निश्चित करणे.

६. शासनाच्या खालील योजना संदर्भात प्रभावी अंमलबजावणी करुन ठोस फलनिष्पती प्राप्त करणेकरीता आवश्यक संशोधन करुन त्याबाबत संबंधित विभागांना उपाययोजना सुचविणे.

   I. NREGA Social Audit.

   II. ग्रामीण योजनातंर्गत ग्राम स्वच्छता, शौचालये, सांडपाणी व्यवस्थापन या संदर्भातील विविध सांख्यिकी माहितीच्या आधारे अंदाजपत्रक तयार करणे.

   III. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग तसेच आदिवासी उपाययोजनेतंर्गत ग्रामस्तरावरील योजना / सामाजिक वनीकरण याकरीता सुक्ष्म नियोजनातून योजना तयार करणे.

IV. जिल्हा योजनातंर्गत रस्ते विकास, रस्त्याचे मुल्यांकन करुन मजबूतीकरणासाठी आवश्यक अंदाजपत्रकाची तपासणी करणे.

V. जिल्हा विकासाकरीता जिल्हयांच्या विविध विकास कामांकरीता आवश्यक भौगोलिक माहिती व्यवस्थापन (GIS) तयार करणे.

VI. पाणी पुरवठा योजनांचे मुल्यांकन करणे.

VII. महानगर पालिका व नगर पालिका क्षेत्रातील घनकचरा व्यवस्थापन व मलनिस्सारण प्रकल्पाचे मुल्यांकन करणे.

प्रस्तुत प्रकल्पाच्या अंतर्गत वर नमूद केल्याप्रमाणे करावयाची कामे, उपयायोजना इ. उपक्रमाच्या दिशा ठरविण्यासाठी अभियांत्रिकी व अन्य व्यावसायिक अभ्यासक्रमातील विद्यार्थ्यांचे सहाय्य घेऊन प्रकल्पाचे काम पार पाडणे व दिशा ठरविणेबाबत धोरण निश्चितीकरीता वर नमूद केलेल्या कार्य गटाच्या सदस्यांनी त्यांना नेमून दिलेले व वेळोवेळी दिलेल्या निदेशांनुसार आवश्यक ते प्रस्ताव शासनास सादर करावेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२८१७१८३४७३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AVHAD PRAKASH B

Digitally signed by AVHAD PRAKASH B
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, cn=AVHAD PRAKASH B
Date: 2015.04.28 17:30:16 +05'30'

**( प्रकाश भा. आव्हाड )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा. मुख्यमंत्री, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

३. मा.मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) / मा.राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.

४. मा. सर्व मंत्री / सर्व मा. राज्यमंत्री, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

५. सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव , मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
६. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव , मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
७. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव. मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
८. मा. राज्यमंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
९. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे वरीष्ठ स्वीय सहाय्यक. मंत्रालय, मुंबई -३२
१०. सर्व सहसचिव / उपसचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभागा, मंत्रालय, मुंबई -३२
११. अवर सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई -३२
१२. संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई — ३२
१३. सबंधित सदस्य
१४. निवडनस्ती